**भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक समता कार्यक्रमाअंतर्गत दि.१४ एप्रिल,२०२२ रोजी निमित्त १३१ व्या जयंतीनिमित्त मुंबई येथे आयोजित राज्यस्तरीय कार्यक्रमास निधी उपलब्ध करून देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सान्यावि-२०२२/प्र.क्र.७८/बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १२ एप्रिल, २०२२.

<u>संदर्भ</u> - १. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : सान्यावि-२०२२/ प्र.क्र.७८/बांधकामे, दि.५.४.२०२२
२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : सान्यावि-२०२२/ प्र.क्र.७८/बांधकामे, दि.५.४.२०२२

<u>प्रस्तावना :-</u>

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी भारतीय राज्यघटनेद्वारे देशाला समता, स्वातंत्र्य व बंधुत्व या त्रयीने समाजामध्ये एकात्मता निर्माण करण्याचा प्रयत्न केलेला आहे. राज्य घटनेच्या कलम ४६ मध्ये घटनेने समाजातील दुर्बल वंचितांबाबत राज्याची जबाबदारी अत्यंत दुरदर्शीपणाने व गांभीर्याने नमूद केलेली आहे. कलम ४६ मध्ये "राज्य हे दुर्बलतर जनवर्ग आणि विशेषत: अनुसूचित जाती व अनुसूचित जनजाती यांचे विशेष काळजीपूर्वक शैक्षणिक व आर्थिक हितसंवर्धन करील आणि सामाजिक अन्याय व सर्व प्रकारचे शोषण यापासून त्यांचे संरक्षण करेल." असे नमूद करण्यात आले आहे. वरील निर्देशांचे अनुषंगाने अनुसूचित जाती व सर्व प्रकारचे पीड़ीत शोषित असलेल्यांना सामाजिक न्याय, आर्थिक व सामाजिक संरक्षण उपलब्ध करून देण्याबाबत राज्य सरकार सातत्याने प्रयत्न करीत आहे. त्याअनुषंगाने अनुसूचित जाती, वंचित दुर्बल घटकांच्या सर्वांगीण विकासाचे ध्येय म्हणून विविध कल्याणकारी योजना राज्यभर राबविण्यात येत आहेत. या सर्व योजनांची माहिती सर्वसामान्य जनतेला व्हावी तसेच त्याचे उद्देश साध्य व्हावेत, या करीता राज्यात "भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक समता कार्यक्रम साजरा करण्यात येत आहे. त्याअंतर्गत मुंबई येथे आयोजित राज्यस्तरीय कार्यक्रमाच्या खर्चाकरीता निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

<u>**शासन निर्णय:-**</u>

राज्यात "भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक समता कार्यक्रम" दिनांक ६ एप्रिल, २०२२ ते १६ एप्रिल, २०२२ या कालावधीत साजरा करण्याचा निर्णय संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. तसेच, सदर कार्यक्रमाच्या सनियंत्रणाकरीता संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आली आहे. त्यानुषंगाने, मुंबई येथील सदर कार्यक्रमाकरीता येणाऱ्या रू.५५,६०,१००/-(अक्षरी रूपये पंचावन्न लक्ष साठ हजार शंभर फक्त) इतक्या अंदाजित रकमेस तत्वत: मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१. सदर खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा दि.०१.१२.२०१६ मधील ४.२, ४.३, ४.५, ४.५.१ तरतूदी, मुंबई वित्तीय नियम, १९५८ मधील तरतूदी, महाराष्ट्र कोषागार नियमातील २८९ व २९० नुसार कार्यवाही करावी.

तसेच कार्यक्रम करताना माहिती व जनसंपर्क संचालनालयाच्या प्रचलित दरानुसार खर्च करावा.

२. कार्यक्रमानंतर त्याबाबतचा सविस्तर अहवाल शासनास सादर करून त्यास मंजूरी घेण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील .

३. सदर कार्यक्रमाचे आयोजन करतांना अवाजवी खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

४. उक्त कार्यवाही करतांना खरेदी करण्यात आलेले साहित्य हे प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, मुंबई विभाग यांनी सुस्थितीमध्ये ताब्यात घेऊन विभागाच्या पुढील आयोजित कार्यक्रमाकरीता वापरात घ्यावे.

२. सदर कार्यक्रमाला येणाऱ्या खर्चास, नियंत्रक अधिकारी तथा प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार, महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था पुणे यांनी नियंत्रक अधिकारी, सदस्य कार्यक्रम सनियंत्रण समिती तथा प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, मुंबई यांना निधी तात्काळ उपलब्ध करुन द्यावा.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४१२१६१४१२४७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANIL KONDAJI AHIRE

Digitally signed by ANIL KONDAJI AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUCTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD9B93035F4DA174C04FA71634FE1F6AA493C78A5335F985651F937888DF7A89, cn=ANIL KONDAJI AHIRE
Date: 2022.04.12 16:17:19 +05'30'

**( अ. को. आहिरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५) अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव/सचिव, सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व विभागीय आयुक्त, महसुली विभाग
७) आयुक्त, समाजकल्याण, पुणे
८) सर्व जिल्हाधिकारी
९) महासंचालक डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण केंद्र, पुणे
१०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनाय, मंत्रालय, मुंबई
११) संचालक, महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
१२) व्यवस्थापकीय संचालक, साहित्यरत्न लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
१३) व्यवस्थापकीय संचालक, संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
१४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई

१५) अध्यक्ष, सर्व जिल्हा जात पडताळणी समिती
१६) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
१७) सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण
१८) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद.
१९) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर.
२०) निवासी लेखा परिक्षक, मुंबई/ अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२१) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२२) सर्व सह / उपसचिव, अवर सचिव, कक्ष अधिकारी, सा.न्या. व.वि.स. विभाग, मंत्रालय, मुंबई.